अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ नियम व २००८ आणि सुधारीत नियम, २०१२ अक्राणी तालुक्यातील ( जि. नंदुरबार ) ८८ वन गावांना महसूल गावांचा दर्जा देण्यासाठी वन गावांचे भूमापन करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः वहका-२०१७/अनौ.सं.क्र.११/प्र.क्र.२३/का-१४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १८ जुलै, २०१७

**वाचा -**

१) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम २०१२.

२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, पुणे यांचे पत्र क्र.भूमापन-३/वि.नों.क्र. २२८/२०१६, दि. २९.१०.२०१७

३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः वहका-२०१७/अनौ.सं.क्र.११/प्र.क्र.२३/का-१४, दि. २३ मार्च, २०१७

४) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र. वहका-२०१७/ प्र.क्र.१४९/का.३(७)/२१२६, दि. २९ मार्च, २०१७

**शासन निर्णय:-**

अक्राणी तालुक्यातील ( जि. नंदुरबार ) ८८ वन गावांची आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करुन मोजणी करणे व सदर गावांना महसूली गावांचा दर्जा प्राप्त करुन देणे यासाठी रु. ४,९५,३३,७६४/- इतकी रक्कम "अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी अंतर्गत वाटप केलेल्या वनजमिनीची मोजणी करण्याकरिता शुल्काचे प्रदान ( २२२५डी२५१), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर )" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून खर्च करण्यास संदर्भ क्र. ३ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. मात्र, सदर प्रयोजनासाठी सन २०१६-१७ या वर्षासाठी अर्थसंकल्पित केलेल्या रु. १५,००,००,०००/- पैकी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BDS) उपलब्ध झालेली रु. १२,००,००,०००/- इतकी रक्कम जिल्हाधिकारी यांचे मागणीनुसार त्यांना वितरीत केल्यामुळे संदर्भ क्र. ३ ची अंमलबजावणी करता आली नाही, असे आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी संदर्भ क्र. ४ अन्वये शासनास कळविलेले आहे.

२. उक्त बाब विचारात घेता, अक्राणी तालुक्यातील ( जि. नंदुरबार ) ८८ वन गावांची आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करुन मोजणी करण्याकरिता संदर्भ क्र. ३ अन्वये खर्च करण्यास मान्यता दिलेला रु. ४,९५,३३,७६४/- इतका निधी "मागणी क्रमांक टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- ०२, अनुसूचित जमातीचे कल्याण- ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना- (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (५४) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी अंतर्गत वाटप केलेल्या वनजमिनीची मोजणी करण्याकरिता शुल्काचे प्रदान ( २२२५डी२५१), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर )" या लेखाशिर्षातून भागविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी अंतर्गत वाटप केलेल्या वनजमिनीची मोजणी करण्याकरिता शुल्काचे प्रदान ( २२२५डी२५१), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर ) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी अर्थसंकल्पित केलेल्या व आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांच्या अधिनस्त असलेल्या रु. १५,००,००,०००/- इतक्या तरतुदीपैकी रु. २,४७,६६,८८२/- ( रुपये दोन कोटी सत्तेचाळीस लक्ष सहासष्ट हजार आठशे ब्याऐंशी मात्र ) इतकी रक्कम जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पहिल्या टप्प्यात उपलब्ध करुन देण्यात यावी.

४. संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या अटी व शर्ती जशाच्या तशा लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१७०७१८१५२२४४२५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Yuvagaunda Patil

Digitally signed by Sunil Yuvagaunda Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=242a9d4c980f22d1ebad86187039dae244ea2a9a89754cff19bc6510261eccdd, cn=Sunil Yuvagaunda Patil
Date: 2017.07.18 15:22:53 +05'30'

**( सुनिल पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर
१०. महालेखापाल ( लेखा परिक्षा ), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर
११. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
१२. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. जिल्हाधिकारी, नंदुरबार
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार
१५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१६. जिल्हा अधिक्षक, भुमि अभिलेख, नंदुरबार.
१७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
१८. तहसिलदार, अक्राणी जि. नंदुरबार
१९. उप अधिक्षक भूमि अभिलेख, अक्राणी, जि. नंदुरबार
१९. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदुरबार
२०. अवर सचिव, अर्थसंकल्प (का.६, /का.६-अ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२१. निवडनस्ती (का.१४) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.